**अंगणवाडी सेविका / मदतनीस यांचे मानधन नियमित प्रदान करण्यासाठीची उपाययोजना.**

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
शासन परिपत्रक क्रमांक :- संकीर्ण-२००९/प्र.क्र.६/कोषा प्र-५.
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०७ जुलै, २००९.

**संदर्भ:-** शासन परिपत्रक क्र. संकीर्ण १००९/ प्र.क्र. ६/ कोषा प्र ५, दि. ०३ /०२/२००९.

**परिपत्रक:**

उपरोक्त संदर्भाधिन शासन परिपत्रकान्वये अंगणवाडी सेविका आणि मदतनीस यांना प्रत्येक महिन्याला नियमीत मानधन तसेच वाढीव मानधन महाराष्ट्र कोषागार नियमावलीतील नियम क्र १५३ (१०) मध्ये अस्तित्वात असलेल्या तरतुदीनुसार "०२ - मजूरी " या तपशिलवार शिर्षातून प्रदान करण्यासाठी शासनाने मान्यता दिलेली आहे.

तद्नंतर या संदर्भात बी. डी. एस. प्रणालीतून उणे प्राधिकारपत्र (minus authorization slip) काढण्यासाठीची सोय सदर प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आली.

वरीलप्रमाणे वेळेवर मानधनाचे प्रदान होण्यासाठी शासनाकडून सोय उपलब्ध करुन देण्यात आली आहे. तथापी असे निदर्शनास आलेले आहे की, अंगणवाडी सेविकांचे मानधन नियमितपणे प्रदानास विलंब होतो. सदर विलंब टाळण्याचेदृष्टीने संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी काटेकोरपणे विहित वेळेत कार्यवाही करणे आवश्यक आहे.

ज्याप्रकारची कार्यवाही वेतन देयके प्रदान करण्यासाठी केली जाते, त्याचप्रमाणे मानधन प्रदान करण्यासाठीची कार्यवाही समयबध्द पध्दतीने कोषागारात होईल यासाठीची दक्षता प्रत्येक कोषागार अधिकारी यांनी घ्यावी व मानधनाचे प्रदान वेळेवर होईल असे पहावे. कुठल्याही संयुक्तीक कारणाशिवाय देयकाच्या प्रदानासाठी विलंब झाल्यास संबंधितांवर कारवाई करण्यात येईल याची नोंद घ्यावी.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २००९०७०७१८०६४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( स.अ.मु.नकवी )
शासनाचे उप सचिव

**प्रति,**
**राज्यपालांचे सचिव,**
**मुख्यमंत्र्यांचे व उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,**

सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालय प्रमुख,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,

- सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
- प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
- प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
- प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
- सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
- प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
उपसंचालक, ले. व को. पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, कोकण भवन, नवी मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / बांद्रे,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व कोषागार अधिकारी,
सर्व उपकोषागार अधिकारी,
उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, कार्यासन-४ मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, कोषा प्रशा-५ कार्यासन, वित्त विभाग

---